**अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृहाच्या बांधकामाकरिता व व्यवस्थापनाकरिता निधी उपलब्ध करण्याबाबत. सन २०१८-१९ करिता निधी वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वसगृ -२०१८/प्र.क्र.७०/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ डिसेंबर, २०१८.

वाचा -

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५/का.८, दि.०२ मार्च, २०१०,
२) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का.८, दि.२० डिसें., २०११,
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८,
४) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ-२०१८/प्र.क्र.७०/का.८, दि.०१ सप्टेंबर, २०१८, दि.१७ ऑक्टाबर, २०१८ व दि.३० नोव्हेंबर, २०१८.
५) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.नियोजन/१४(१/५) अल्प.मु.व/३११३/२०१८, दि.१३ नोव्हेंबर, २०१८.
६) जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र.ससाशा/कार्या-०२/उपयोगिता प्रमाणपत्र/२०१८, दि.२६ नोव्हेंबर, २०१८.
७) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र.२०१८/अल्पसंख्याक/सामान्य/कावि-५८२, दि.२६ नोव्हेंबर, २०१८.

प्रस्तावना -

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. राज्यातील विविध विद्यापीठांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीवर अल्पसंख्याक मुलींसाठी वसतिगृह बांधण्यासंदर्भातील कार्यपध्दती दि.२० डिसेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे. तसेच अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांकरिता बांधण्यात येत असलेल्या वसतिगृहांच्या व्यवस्थापनाबाबत कार्यपध्दती दिनांक २१ जून, २०१३ व दि.२८ जुलै, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींच्या वसतिगृह बांधकाम करण्याकरिता सन २०१८-१९ करिता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर )"या लेखाशिर्षाखाली रु.१६.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकान्वये तसेच सन २०१८-१९ च्या अंदाजानुसार या आर्थिक वर्षातील प्रथम नऊमाहीकरिता आवश्यक असणारा कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधीच्या एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत म्हणजेच रू.११,२०,००,०००/-(अक्षरी रू. अकरा कोटी वीस लक्ष फक्त) निधी उपलब्ध करण्यात आला. त्यापैकी संदर्भ क्र.४ येथील ३ शासन निर्णयांन्वये रू.५,४०,००,०००/-(अक्षरी रू.पाच कोटी चाळीस लाख फक्त) निधी वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र.५, ६व ७ च्या पत्रांन्वये माहे सन २०१८-१९ करिता शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, सांगली, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी येथील वसतिगृहाच्या बांधकामाकरिता व पूर्णा, परभणी येथील वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता निधी वितरीत करण्याची मागणी केलेली असून सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी व परभणी यांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ च्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता आवश्यक असणारा कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७० % मर्यादेत एकूण रू.३,६७,३०,०००/- (अक्षरी रू.तीन कोटी सदुसष्ट लाख तीस हजार फक्त) निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**(वितरित निधी रू.मध्ये)**

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|
| | **बांधकामाकरिता** | |
| १ | शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, सांगली | १,५०,००,०००/- |
| २ | शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी | २,००,००,०००/- |
| | **व्यवस्थापनाकरिता** | |
| ३ | पूर्णा, परभणी | १७,३०,०००/- |
| | **एकूण** | **३,६७,३०,०००/-** |

२. वरीलप्रमाणे जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी व परभणी यांना त्यांच्या अधिपत्याखालील शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, सांगली, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या बांधकामाकरिता व पूर्णा, परभणी येथील अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या वसतिगृहाच्या व्यवस्थापनाकरिता एकूण रू.३,६७,३०,०००/-(अक्षरी रू.तीन कोटी सदुसष्ट लाख तीस हजार फक्त) एवढी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी व परभणी यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी प परभणी "नियंत्रक अधिकारी" आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून काम पाहतील.

४. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी व परभणी यांनी शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करावे तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या दि. २ एप्रिल, २०१८ रोजीच्या परिपत्रकातील सूचनानुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी. उपरोक्त निधीचा आढावा घेऊन निधी अखर्चित रहात असेल वा समर्पित करावयाचा असेल तर तो B.D.S. प्रणालीवर माहे फेब्रुवारी, २०१९ पर्यंत समर्पित करण्यात यावा. निधी योग्यवेळी समर्पित न केल्याने निधी वाया गेल्यास/ उपयोगात न आल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी कार्यालयातील संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

५. सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा/ CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी व परभणी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

६. सदरचा खर्च मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसंख्यांक समाजातील वसतीगृहाकरिता सहायक अनुदान (२२३५ ए १४२), ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. " सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८ मधील परिच्छेद ७ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१८१२२६११३७४२१९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.12.26 11:46:48 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा ), मुंबई/नागपूर,
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) जिल्हाधिकारी, सांगली, रत्नागिरी, परभणी
५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई ,
६) प्राचार्य/अध्यक्ष/संचालक (शासकीय तंत्रनिकेतन, मिरज, सांगली, शासकीय तंत्रनिकेतन, रत्नागिरी व अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह, पुर्णा, परभणी)
७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई,
८) अवर सचिव, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली, रत्नागिरी, परभणी,
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४) मंत्रालय, मुंबई
११) नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१२) निवड नस्ती, का.८.